**जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांच्या दिनांक १५.११.१९७६ ते दिनांक ३१.०३.१९८१ या कालावधीच्या ज्येष्ठतासूचीत सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : ज्येष्ठता ११०९/(३१२/२००९) आ.(तांत्रिक),**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ .**
**दिनांक :- १८/०३/२०११.**

**परिपत्रकः-**

जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावर दिनांक १५.११.१९७६ ते दिनांक ३१.०३.१९८१ या कालावधीत नियुक्ती दिलेल्या कनिष्ठ अभियंत्यांची अंतिम ज्येष्ठतासूची शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक ज्येष्ठता ११०३/(२४४/२००३) आ.(तांत्रिक) , दिनांक २१.०२.२००७ अन्वये प्रसिध्द करण्यात आली होती. तसेच, सदर यादीत त्यानंतर काही शासन परिपत्रकान्वये काही सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर ज्येष्ठतासूचीमध्ये काही त्रुटी निदर्शनास आल्याने ज्येष्ठतेसंदर्भात सुधारणा करुन त्यांची सुधारित ज्येष्ठतेची नोंद सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्यानुसार करण्यात येत आहे.

सदर परिशिष्टात नमूद केलेल्या सुधारित नोंदीबाबत संबंधितांना कळविण्याची जबाबदारी संबंधित मंडळ कार्यालयाची राहील, याची नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३१८१५२०४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

मुनिधुरी

**( मु. नि. धुरी )**
**शासनाच्या अवर सचिव**

प्रत :-
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळ.

प्रत :- आ.(शा.अ.)/आ.(ज्येष्ठता)/आ.(वर्ग २) कार्यासने , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रत :- आ.(तांत्रिक ) संग्रहार्थ .

| शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता-११०९/( ३१२ /२००९) , दि.    /०३ /२०११ चे परिशिष्ट | | | |
|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **ज्येष्ठता सूची क्रमांक व कर्मचा-यांचे नांव** | **कार्यालयाचे नाव** | **केलेली सुधारणा** |
| १ | ४९५३-अ<br>विनायक शं. दैवज्ञ | लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर | डी.सी.ई परीक्षा दि. २२/६/७७ रोजी उत्तीर्ण केलेली असल्याने त्या दिनांकावर अ.क्र. ४९९६-अ येथे सेवा ज्येष्ठता निश्चित केली व अ.क्र. ४९५३-अ येथील नोंद वगळली. डी सी ई उत्तीर्ण होण्यापूर्वीची सेवा दि. ३१/५/७७. |
| २ | ४९२२<br>पी. मनगोळी | औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद. | नावात पी. मनगुळी ऐवजी रमेश पी. मनगुळी अशी सुधारणा केली. |